कौटुंबिक न्यायालय, बीड न्यायालयासाठी संगणक सामुग्री खरेदी करण्याकरिता रु.१८,७७,८९०/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संप्रिसा- २०२१/प्र.क्र.३९/का. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०८ मे, २०२३.

**संदर्भ:-** १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. Spl./Comp./४९०/२०२२, दिनांक २१.१०.२०२२.
२) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक ०२.०२.२०२३.
३) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. Spl/Comp/१८९/२०२३, दिनांक ०३.०३.२०२३.
४) विभागाच्या दिनांक २४.०४.२०२३ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांनी लघुवाद न्यायालय, मुंबई व वांद्रे शाखा यांच्या कार्यालयासाठी नवीन संगणक सामग्री खरेदी करण्याकरिता संदर्भ क्र. १ अन्वये प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे अभिप्राय घेण्यात आले. यानुषंगाने संदर्भ क्र.३ अन्वये सुधारित प्रस्ताव सादर करण्यात आला असून, विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २४.०४.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. यानुषंगाने कौटुंबिक न्यायालय, बीड न्यायालयासाठी संगणक सामुग्री खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कौटुंबिक न्यायालय, बीड न्यायालयासाठी संगणक सामुग्री खरेदी करण्याकरिता रु.१८,७७,८९०/- (अक्षरी रु. अठरा लक्ष सत्याहत्तर हजार आठशे नव्वद फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर संगणक सामग्री खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | संगणक सामुग्री | संख्या | दर | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १. | ऑल इन वन संगणक (उबुंटू) | १२ | रु.७८,९००/- | रु.९,४६,८००/- |
| २. | प्रिंटर्स | १२ | रु.२९,९९९/- | रु.३,५९,९८८/- |
| ३. | सर्व्हर-सीआयएस प्रणालीसाठी | ०१ | रु.३,९३,०३४/- | रु.३,९३,०३४/- |
| ४. | युपीएस -सर्व्हरसाठी | ०१ | रु.४४,४८१/- | रु.४४,४८१/- |
| ५. | युपीएस-संगणकांसाठी | १२ | रु.४,३४९/- | रु.५२,१८८/- |
| ६. | ऑल इन वन मोनो प्रिंटर | ०१ | रु.५८,०००/- | रु.५८,०००/- |
| ७. | स्कॅनर | ०१ | रु.२३,३९९/- | रु.२३,३९९/- |
| | | | **एकूण** | **रु.१८,७७,८९०/-** |

३. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार GeM पोर्टलवरुन विहित पध्दतीने करण्यात यावी.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०९१५४१३०८०१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2023.05.09 15:42:51 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
२. प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, बीड.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ, चर्चगेट, मुंबई-२०.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन-१३, २३ व २४ विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती/का. ७.